**प्रधानमंत्री पीक विमा योजना खरीप हंगाम सन २०१७ मध्ये वाढीव एक दिवसाच्या कालावधीत सहभाग घेतलेल्या व नुकसान भरपाईस पात्र ठरलेल्या शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्यास मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०१७ /प्र.क्र.०१/११ अे,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: ०१ फेब्रुवारी २०१९

**वाचा -**

१. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो/२०१७-प्र.क्र -११/१.अे, दि.२०.०६.२०१७
२. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.१/११- अे, दि.२३.६.२०१७
३. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.१/११- अे, दि.१.८.२०१७
४. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.१/११- अे, दि.४.८.२०१७
५. कृषि संचाालक (वि.प्र.) कृषि आयुक्ताल पूणे यांचे पत्र क्र. जा.क्र./सां ८/ ४३४/२०१८, दि.१०.८.२०१८

**प्रस्तावना :-**

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप-२०१७ मध्ये तांत्रीक कारणास्तव ज्या बिगर कर्जदार शेतकऱ्यांना सदर योजनेत सहभागी होता आले नाही, त्यांचेकरिता राज्य शासनाच्या स्तरावर एक दिवसाची म्हणजेच दि.०५.०८.२०१७ पर्यंत सहभागी होण्यासाठी मुदतवाढ संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आली होती. सदर एक दिवसाच्या कालावधीत जन सुविधा केंद्रावर त्यानुसार सदरच्या वाढीव एक दिवसाच्या कालावधीत अर्ज भरलेल्या शेतकऱ्यांपैकी नुकसान भरपाईस पात्र ठरणाऱ्या शेतकऱ्यांचे दायीत्व राज्य शासनाने स्विकारले आहे. वाढीव एक दिवसाच्या कालावधीत सहभाग घेतलेल्या शेतकऱ्यांपैकी नुकसान भरपाईसाठी पात्र ठरलेल्या शेतकऱ्यांना जिल्हास्तरावरुन रु.६९.४८ कोटी इतक्या रकमेची नुकसान भरपाई अदा करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप-२०१७ मध्ये राज्य शासनाच्या स्तरावर एक दिवसाची म्हणजेच दि.०५.०८.२०१७ पर्यंत सहभागी होण्यासाठी मुदतवाढ देऊन या एक दिवसाच्या कालावधीत सहभागी होणाऱ्या शेतकऱ्यांपैकी नुकसान भरपाईस पात्र ठरणाऱ्या शेतकऱ्यांना रू.६९.४८ कोटी नुकसान भरपाई देण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. नुकसान भरपाईस पात्र ठरणाऱ्या शेतकऱ्यांना अदा करावयाच्या नुकसान भरपाईच्या रकमेची पडताळणी व प्रमाणीकरण करून सदर नुकसान भरपाई प्रचलित पध्दतीचा अवलंब करून जिल्हा स्तरावरून जिल्हाधिकारी यांच्या मार्फत अदा करण्याची कार्यवाही आयुक्त (कृषि) यांनी करावी.

३. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात येईल .

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन, ३३ - अर्थसहाय्य**
**११०, पीक विमा (००) (०८) प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय्य राज्य हिस्सा (२४०१ A ६६४) योजनेतर**

४. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. सं.क्र.३१८/२०१८/व्यय-१, दि.२२.१.२०१९ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरून शासनाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०२११३१०७७३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by Dr.Kiran Patil
Date: 2019.02.02 11:33:40 +05'30'

**(डॉ. किरण पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर

११.वित्त विभाग (व्यय-१/अर्थ.१३), मंत्रालय, मुंबई- ३२

१२.उप सचिव (११-अे/२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक

१३.कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२

१४.विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३

१५.निवड नस्ती (कार्यासन ११-अे).